**आमदार स्थानिक विकास कार्यक्रम**

**सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात समर्पित निधी सन २०१८-१९ मध्ये लेखाशिर्ष ४५१५००१२ अंतर्गत जिल्हानिहाय उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन ज्ञापन क्र. स्थाविका-०६१८/प्र.क्र. ८४/का-१४८२**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१८

**वाचा**:- १) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक- स्थाविका-०६१६ /प्र.क्र.९६/का-१४८२, दि. १२.७.२०१६
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दिनांक २७.७.२०१८

**ज्ञापन -:**

महाराष्ट्र विधानमंडळाने, “महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१८” मंजूर केले असून ते महाराष्ट्राचे राज्यपाल महोदय यांच्या अधिसंमतीनुसार महाराष्ट्र अधिनियम क्र. ४५ म्हणून, महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १७ जुलै, २०१८ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाकरीता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात एकूण रु. ८९७,६४,७४,०००/-लक्ष (अक्षरी आठशे सत्त्याण्णव कोटी चौसष्ट लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतका निधी सर्व जिल्हाधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात आला होता. त्यापैकी माहे ३१ मार्च, २०१८ अखेर झालेला खर्च वजा जाता जिल्हयांकडे अखर्चित राहिलेला व शासनास समर्पित केलेल्या निधीपैकी जिल्हयांनी मागणी केल्यानुसार रु. २२०.३१५५ कोटी (रु. दोनशे वीस कोटी एकतीस लक्ष पंचावन्न हजार फक्त) इतका निधी सन २०१८-१९ मध्ये पुन्हा उपलब्ध करुन देण्यासाठी जुलै, २०१८ च्या विधानमंडळाच्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणी मंजूर करण्यात आलेली आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील शासन परिपत्रकान्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला निधी वितरीत करण्याबाबतच्या सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत केलेला निधी वितरीत करण्यापूर्वी वित्त विभागाची सहमती घेणे आवश्यक असल्याने प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. त्यास वित्त विभागाने दिलेल्या मंजुरीनुसार व जिल्हयांकडून प्राप्त मागणीनुसार रु. २२०,३१,५५,०००/- (रु. दोनशे वीस कोटी एकतीस लक्ष पंचावन्न हजार फक्त) एवढा निधी सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे या ज्ञापनान्वये सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधी बीम्स संगणक प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. या निधीचे पुढील वितरण संदर्भाधीन शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक १२ जुलै, २०१६ मधील तरतूदीच्या अधिन राहून तात्काळ करावे. सदर निधीमधून खर्च करतांना वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकांमधील तसेच वित्त विभागाने वेळोवळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष व वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन इ. चे काटेकोरपणे पालन करावे.

४. सन २०१८-१९ या अर्थिक वर्षात आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाकरीता यापूर्वी वितरीत केलेल्या व या ज्ञापनान्वये मंजूर केलेल्या निधीचा विनियोग दिनांक ३१ मार्च, २०१९ पूर्वी पूर्णपणे होईल याची जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी तसेच या निधीमधून झालेल्या खर्चाचा ताळमेळ विहित वेळेत पूर्ण करुन उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी. तसेच वर्षअखेर बचत संभवत असल्यास त्या बचतीची कारणे देऊन सदर बचत आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी शासनास समर्पित करण्याची दक्षता घ्यावी.

५. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खालील लेखाशिर्षांतर्गत खर्च करण्यात यावा.

मागणी क्रमांक ओ-१०
४५१५- इतर ग्राम विकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च
१०२ सामुहिक विकास
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना
(१) बहुउद्देशीय कार्यक्रम
(००) (०१) आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम
(४५१५ ००१२) (कार्यक्रमांतर्गत) (दत्तमत) ५३ मोठी बांधकामे

६. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.सं क्र. २२७/२०१८/व्यय-८/२०१८, दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०८२७१७०२३९३७१६ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7de9682e22326e67a2c7e4125e658721c298e35048adffdff595b37a1b194aa, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2018.08.27 17:06:47 +05'30'

सोबत: विवरणपत्र

**( वि.फ. वसावे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१ मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
२ मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
३ महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
४ जिल्हाधिकारी, (सर्व)
५ उपायुक्त (नियोजन), कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर
६ जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
७ जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
८ अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९ वित्त विभाग ( अर्थ-१६ / व्यय- ८ )
१० नियोजन विभाग, का-१४२४,
११ निवडनस्ती, का-१४८२, नियोजन विभाग.

शासन ज्ञापन क्र. स्थाविका-०४१८/प्र.क्र. ५६/का.१४८२, दि. २७ ऑगस्ट, २०१८ चे सहपत्र

| अ.क्र. | जिल्हा | सन २०१७-१८ मध्ये समर्पित निधीपैकी सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध करुन दिलेला निधी (रु. हजारांत) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | मुंबई शहर | ६३८८८ |
| २ | मुंबई उपनगर | ५५९६० |
| ३ | ठाणे | ३२४६६ |
| ४ | पालघर | २९०४५ |
| ५ | रायगड | ५२७३५ |
| ६ | रत्नागिरी | ९५६७ |
| ७ | सिंधुदुर्ग | २१४९९ |
| ८ | नाशिक | २०८७६६ |
| ९ | धुळे | १७०९२ |
| १० | जळगाव | ११९१३ |
| ११ | अहमदनगर | ४९४१० |
| १२ | पुणे | २४३३०७ |
| १३ | सातारा | २६५६७ |
| १४ | सांगली | ३१७५६ |
| १५ | सोलापूर | १८४१७२ |
| १६ | औरंगाबाद | १७४२४६ |
| १७ | जालना | ५२७१४ |
| १८ | बीड | १७२६३२ |
| १९ | परभणी | ३०३८३ |
| २० | हिंगोली | ५१५३८ |
| २१ | नांदेड | ३४५७८ |
| २२ | उस्मानाबाद | ८६९४२ |
| २३ | लातूर | ११२५५० |
| २४ | बुलडाणा | ११७१८९ |
| २५ | अकोला | ६७६४० |
| २६ | वाशिम | ३९४५६ |
| २७ | अमरावती | ९०४६४ |
| २८ | यवतमाळ | ६९१६७ |
| २९ | नागपूर | १४१७७ |
| ३० | वर्धा | ३८१२ |
| ३१ | चंद्रपूर | ३८६२७ |
| ३२ | गडचिरोली | ८८९७ |
|  | **एकूण...** | **२२०३१५५** |

(रु. दोनशे वीस कोटी एकतीस लक्ष पंचावन्न हजार फक्त)

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7de9682e22326e67a2c7e4125e658721c298e35048adffdff595b37a1b194aa, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2018.08.27 17:07:26 +05'30'

(वि.फ. वसावे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन